**शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्य हाताळणूकीबाबत हमालीचे काम करणाऱ्या हमाल कामगारांना लेव्हीच्या रकमेची अदायगी करण्याबाबत मार्गदर्शक सुचना....**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक: संकिर्ण-१८१६/प्र.क्र.१६१/ना.पु.१६अ**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : ३० जानेवारी, २०१७**

**संदर्भ :-** महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजिवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम १९६९

**प्रस्तावना :-**

संदर्भिय शासन अधिनियमातील तरतूदीनुसार राज्यस्तरीय शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्य हाताळणूकीचे काम करणाऱ्या हमाल कामगारांना लेव्हीची रक्कम अदा करणे अभिप्रेत आहे. राज्यातील काही जिल्ह्यात हमाल कामगारांना देण्यात येणाऱ्या मजुरी/ वेतनातून लेव्हीची रक्कम वजा केली जाते, तर काही जिल्ह्यांमध्ये मजुरी/वेतनाच्या रक्कमेवर वेगळ्याने लेव्हीची रक्कम दिली जाते. तर काही जिल्ह्यामध्ये लेव्ही दिली जात नसल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आलेली आहे. त्यामुळे लेव्ही आधारभूत दरामध्ये समाविष्ट आहे किंवा आधारभूत दरावर देणे अभिप्रेत आहे, तसेच तिची परिगणना कशी करावी, या संदर्भात उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे अभिप्राय घेण्यात आले. त्यानुसार राज्यातील शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्य हाताळणूकीचे काम करणाऱ्या हमाल कामगारांना अदा करावयाच्या लेव्ही संदर्भात सूस्पष्ट सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजिवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम १९६९ मधील खंड ४१ व ४२ मधील तरतूदीनुसार राज्यातील शासकीय गोदामामध्ये अन्नधान्य हाताळणूकीचे काम करणाऱ्या हमाल कामगारांना अदा करावयाच्या लेव्हीच्या परिगणनेबाबत पुढील प्रमाणे मार्गदर्शक सुचना देण्यात येत आहेत.

१) जे हमाल कामगार माथाडी मंडळाकडे / कामगार आयुक्तांकडे नोंदणीकृत असतील अशा कामगारांना लेव्ही प्रदेय आहे.
२) शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्य हाताळणूकीचे काम करणाऱ्या हमाल कामगारांना जिल्ह्याशी संबंधित माथाडी मंडळाने ठरवून दिलेल्या बाबनिहाय दरानूसार लेव्हीची रक्कम जिल्हा

पुरवठा अधिकारी यांनी परस्पर माथाडी मंडळाकडे जमा करणे बंधनकारक आहे. हे दर ५० % पेक्षा जास्त नसावेत.

३) लेव्हीची रक्कम ही आधारभूत दरामधून प्रदेय नसून ती, त्या त्या वेळच्या आधारभूत दरावर जिह्याशी संबंधित माथाडी मंडळाने ठरवून दिलेल्या टक्केवारीनुसार प्रदेय राहिल.

४) जेथे निविदा पध्दतीने कंत्राटदार निश्चित करुन हमालीचे काम करण्यात येत आहे व प्राप्त दर हे लेव्हीसह मान्य करण्यात आलेले आहेत तेथे वेगळयाने लेव्ही देण्याची आवश्यकता नाही. अशा ठिकाणी पुढील प्रमाणे कार्यवाही करावी.

(अ) हमाल कंत्राटदरास हमालीचे देयक अदा करतांना जिह्याशी संबंधित माथाडी मंडळाने ठरवून दिलेल्या लेव्हीच्या टक्केवारीनुसारची रक्कम कापून जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी परस्पर माथाडी मंडळात जमा करावी.

५) जेथे कामगार विभागाकडून निर्धारित किमान वेतनावर काम करण्यात येत आहे त्या ठिकाणी कामगारांना किमान वेतन अधिक महागाई भत्ता यावर संबंधित माथाडी मंडळाद्वारे निश्चित केल्याप्रमाणे लेव्ही वेगळयाने देण्यात यावी.

६) लेव्हीमध्ये अंतर्भूत असलेल्या बाबी, त्यांचे प्रमाण (टक्केवारी सह) सुनिश्चित होण्याच्या दृष्टीकोनातून कामगार आयुक्त / सहायक कामगार आयुक्त यांचेकडून हे टक्केवारीचे प्रमाण प्रमाणित करण्यात यावे.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०१३०१७३५०५०००६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Shridhar Supe

Digitally signed by Satish Shridhar Supe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, cn=Satish Shridhar Supe
Date: 2017.01.30 17:38:57 +05'30'

**(सतिश श्रीधर सुपे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत -:**

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) कामगार आयुक्त, कामगार भवन, प्लॉट सी-२०, ब्लॉक-ई, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
३) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
५) सर्व उपायुक्त (पुरवठा)

६) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
७) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
८) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
९) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ -द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१२) वित्त विभाग ( व्यय ४), मंत्रालय, मुंबई.
१३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (कामगार-५), मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती/नापु-१६अ.